**शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतर अधिक वास्तव्य करण्याबद्दल दंडनीय दराने अनुज्ञप्ती शुल्क आकारणी करण्याबाबत.**

**दंडनीय दरात वाढ**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शानिवा-२५१७/प्र.क्र.३३/१७/२३-अ**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १५ एप्रिल, २०१७.

पहा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शानिवा-१०९५/प्र.क्र.८०७/९५/२३-अ, दि.१०.०९.१९९६.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शानिवा-२५०६/प्र.क्र.७५८/०६/२३-अ, दि.०१.११.२००६.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शानिवा-१०१०/विसआ/प्र.क्र.७४७/२३-अ, दि.११.०४.२०११.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शानिवा-२५११/प्र.क्र.२३९/११/२३-अ, दि.२९ जुलै, २०११.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधिन क्र. ४ येथील दि.२९ जुलै, २०११ च्या शासन निर्णयान्वये, शासकीय निवासस्थानातील अनुज्ञेय कालावधीनंतरच्या वास्तव्यासाठी शासकीय अधिकारी/कर्मचारी /त्यांच्या कुटुंबियांकडून वसूल करावयाचे दंडनीय शुल्क रु. ५०/- प्रति चौरस फूट दरमहा एवढे विहित करण्यात आले आहे.

२. तथापि, दरम्यानच्या कालावधीत खाजगी भाड्याच्या दरात वाढ झालेली आहे. तसेच शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांमध्ये सेवानिवृत्तीनंतर तसेच बदली झाल्यानंतर सुध्दा शासकीय निवासस्थाने अनधिकृतपणे ताब्यात ठेवण्याची प्रवृत्ती मोठ्या प्रमाणावर दिसून येत आहे. परिणामी बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात कार्यरत असलेल्या प्रतीक्षायादीतील गरजू अधिकारी/कर्मचाऱ्यांना शासकीय निवासस्थानापासून वंचित राहावे लागत आहे. सबब, अशा प्रवृत्तीला आळा घालणे आवश्यक आहे. या बाबी विचारात घेऊन सदर दंडनीय दरात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधिन क्र. ४ येथील दि.२९ जुलै, २०११ च्या शासन निर्णयान्वये शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतरच्या वास्तव्याबद्दल विहित करण्यात आलेला दंडनीय दर (अनुज्ञप्ती शुल्क) रु. ५०/- प्रति चौरस फूट दरमहा वरुन रु. १००/- प्रति चौरस फूट दरमहा असा करण्यात येत आहे.

२. हे आदेश दिनांक १ मे, २०१७ पासून अंमलात येतील.

३. याअन्वये हेही स्पष्ट करण्यात येते की या आदेशाच्या दिनांकापूर्वी ज्या प्रकरणी ३० एप्रिल, २०१७ या दिनांकानंतरच्या कालावधीसाठी पूर्वीच्या दरानुसार (रु. ५०/- प्रति चौरस फूट दरमहा) मुदतवाढ/परवानगी देण्यात आलेली आहे अशा प्रकरणी देखील दिनांक १ मे, २०१७ पासून रु. १००/- प्रति चौरस फूट दरमहा हा दर लागू होईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४७/२०१६/सेवा-५, दि.०८.१२.२०१६ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०४१५१४५७३२९३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivdas Mahadeo Dhule

Digitally signed by Shivdas Mahadeo Dhule
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400051, st=Maharashtra, 2.5.4.20=fd353a6a1af02b28757a9a542f2f807ba459543ed19dc809f2f150cfde4470c9, cn=Shivdas Mahadeo Dhule
Date: 2017.04.15 14:59:26 +05'30'

**( शि. म. धुळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
* ४. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने)
* ५. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
* ६. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोक आयुक्त, मुंबई (पत्राने)
७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महराष्ट्र, मुंबई,
८. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महराष्ट्र, नागपूर,
९. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महराष्ट्र, मुंबई,
१०. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महराष्ट्र, नागपूर,
११. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. अधिक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई.
१६. कार्यकारी अभियंता (सा.बां.), इलाखा शहर विभाग, मुंबई.
१७. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई, वरळी, मुंबई - ४०० ०१८.
१८. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई - ४०० ०५८.
१९. कार्यकारी अभियंता, इमारती बांधकाम विभाग, कामगार हॉस्पिटल आवार, मुलुंड (प), मुंबई - ४०० ०८०.
२०. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई, जुने जकात घर, मुंबई - ४०० ०२३.
२१. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. सर्व विभागीय आयुक्त,
२३. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
२४. निवड नस्ती.

* (पत्राने)